चांदुरबाजार, जि. अमरावती येथील तहसिल इमारतीच्या पहिल्या मजल्यावर बांधकाम करण्याच्या अंदाजपत्रक व नकाशास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत......

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग

## शासन निर्णय क्रमांकः बीएलडी-२०१३/प्र.क्र.२००/ई-८,

३२ वा मजला, सेंटर -१ इमारत, जागतिक व्यापार केंद्र,
कुलाबा, मुंबई-४०० ००५.
तारीख: ०५/०८/२०१३.

**वाचा:-**

विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती यांचे क्र.उपआ(साप्र)/जिबी-४/कावि/२०९८/२०१३, दि.३०/११/२०१३ चे पत्र.

**शासन निर्णय:-**

चांदुरबाजार, जि. अमरावती येथील तहसिल इमारतीच्या पहिल्या मजल्यावर बांधकाम करण्याच्या रु. १,८६,६५,०००/- ( अक्षरी रुपये एक कोटी शहाऐंशी लक्ष पासष्ट हजार फक्त ) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रक व नकाशास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सार्वजनिक बांधकाम विभागाकडून अंदाजपत्रकाची सर्वसाधारण तपासणी करुन घेण्यात आली असून त्यात खालील बाबी आढळून आल्या आहे.-

१) सदर इमारतीचे प्रस्तावित बांधकाम क्षेत्रफळ ८३६.४४ चौ.मी. आहे.
२) सदर कामाचे अंदाजपत्रक शासनाच्या टाईप प्लॅनवर आधारित आहेत.
३) अंदाजपत्रक उप विभागीय अभियंता, सा. बां.उपविभाग, चांदुरबाजार यांनी तयार केले असून सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, सा.बां.विभाग, अचलपूर, अधिक्षक अभियंता, सा.बां.मंडळ, अमरावती यांनी साक्षांकित केले आहे.
४) अंदाजपत्रक सन २०१२-१३ च्या जिल्हा दरसूचीवर आधारित आहे. दरसूचीतील वाढीसाठी १० टक्क्यांची तरतुद करण्यात आली आहे. अंदाजपत्रकात पार्किंग,रेन वॉटर व कॅच वॉटर ड्रेन रेन/रुफ वॉटर हार्वेस्टिंग, पथदिवे, अग्निशमन यंत्रणा इत्यादींची तरतूद

ढोबळ स्वरुपात अंदाजे रु. १९.०० लक्ष करण्यात आली आहे. सदरील कामास उपभोक्ता खात्याची सहमती गृहीत धरण्यात येत आहे. तसेच सदरील अतिरिक्त बाबीच्या किंमती या ढोबळ स्वरुपात असून त्याबाबतची प्राथमिकता उपभोक्ता खात्याने त्यांचे स्तरावर ठरवावी. कामाची निकड लक्षात घेता सदरील बाबी ढोबळ स्वरुपात केल्याप्रमाणे ठेवण्यात येत आहेत.

५) अंदाजपत्रकास ११ टक्के विद्युतीकरण, १० टक्के फर्निचर, १० टक्के दरसूचीतील वाढ, ४ टक्के आकस्मिक खर्च या प्रमाणे तरतुदी योग्य करण्यात आल्या आहेत. तर एम-व्हॅटची तरतुद वगळण्यात येत आहे.

६) सदरील काम जर अर्थसंकल्पा व्यतिरिक्त करावयाचे झाल्यास त्यात ४ टक्के सेंटेज चार्जेसची तरतुद मिळविण्यात यावी.

७) पहिल्या मजल्याचे बांधकाम करतेवेळी मुळ इमारतीच्या संरचनात्मक बाबीस हानी पोहोचणार नाही याची कटाक्षाने दक्षता घेण्यात यावी.

८) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक दरपत्रके मंजूर करुनच काम हाती घ्यावे.

३. प्रस्तुत कामाच्या अंदाजपत्रकात वरील प्रमाणे सुधारणे व दुरुस्ती करुन परिच्छेद क्रमांक २ मधील अटींच्या अधीन राहून विषयांकित बांधकामाच्या रु. १,८६,६५,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी शहाऐंशी लक्ष पासष्ट हजार फक्त ) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाची सहमती आहे.

४. प्रस्तावित बांधकामावरील खर्च "४०५९-सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च ०१ कायालयीन इमारती-१०१ बांधकाम पंचवार्षिक योजना अंतर्गत योजना जिल्हा प्रशासन -मागणी क्रमांक एच-८" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सार्वजनिक बांधकाम विभागास उक्त लेखाशिर्षाखाली मंजुर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा. मात्र सदरच्या खर्चासाठी अंदाजपत्रकामध्ये तरतुद केल्याशिवाय बांधकामास सुरुवात करु नये.

५. सदर आदेश सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सहमतीने तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, वि.अ.प्र./१००८/प्रक्र-७०/२००८/विनियम, दिनांक १५/५/२००९ मधील भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अनुक्रमांक १ नियम क्र. १३४ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या शक्तीचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०५१६५९२३६६१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Chandrakant Nivrutti Padale

Digitally signed by Chandrakant Nivrutti Padale
DN: CN = Chandrakant Nivrutti Padale, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = REVENUE AND FOREST
Date: 2014.08.05 17:50:04 +05'30'

**( चं. नि. पाडळे )**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. विभागीय आयुक्त, अमरावती.

२. जिल्हाधिकारी, अमरावती.

३. प्रधान लेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेयता) नागपूर.

४. महालेखापाल (लेखा परिक्षा), मुंबई

५. जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.

६. तहसिल कार्यालय, चांदुरबाजार, जिल्हा अमरावती.

७. सार्वजनिक बांधकाम विभाग (इ मा-३) मंत्रालय, मुंबई.

८. नियोजन विभाग, (का-१४७५) मंत्रालय, मुंबई.

९. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१२ व व्यय-९) मंत्रालय, मुंबई.

१०. निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मुंबई-०५.